तहसील कार्यालय, अचलपूर, जि.अमरावती येथील "कनिष्ठ-लिपिक" या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती.
श्री.द्वि.कि.वानखेडे, लिपिक-टंकलेखक

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१९/प्र.क्र.११६/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १० जानेवारी, २०२०

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रतिनि-२५१९/प्र.क्र.११६/१४-अ, दि.२१-०८-२०१९ ची जाहिरात
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग नस्ती क्र.संकीर्ण २०१९/प्र.क्र.१३६/आस्थापना यांचा प्रस्ताव

## शासन आदेश

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतूदीनुसार संदर्भाधिन क्र. १ च्या जाहिरातीस अनुसरुन मंत्रालयीन विभागातील श्री. द्वि.कि.वानखेडे, लिपिक-टंकलेखक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांच्या सेवा महसूल व वन विभागाच्या अधिपत्त्याखालील तहसील कार्यालय, अचलपूर, जि.अमरावती येथील "कनिष्ठ-लिपिक" (वेतनश्रेणी एस-६:१९९००-६३२००) च्या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. श्री. द्वि.कि.वानखेडे, लिपिक-टंकलेखक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांची प्रतिनियुक्ती धोरणातील सेवेची ७ वर्षे सेवेची अट शिथिल करुन त्यांच्या सेवा महसूल व वन विभागाच्या अधिपत्त्याखालील तहसील कार्यालय, अचलपूर, जि. अमरावती या कार्यालयात **प्रथमत: २ वर्षाच्या कालावधीसाठी** प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देऊन, त्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ व १६-०२-२०१८ मधील तरतुदी विचारात घेऊन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत महसूल व वन विभाग यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४. श्री. वानखेडे, लिपिक-टंकलेखक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी त्यांचे प्रशासकीय विभाग आणि महसूल व वन विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील

५. श्री. वानखेडे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

६ विभागाने प्रतिनियुक्तीने कार्यमुक्त करावयाच्या आदेशात प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होण्याचा दिनांक नमूद करावा.

७. प्रतिनियुक्ती ही संबंधित कर्मचाऱ्याची व प्रतिनियुक्तीवरील कार्यालयाची तात्पुरती व्यवस्था असून संबंधित कर्मचाऱ्याची प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यात आल्यामुळे तो कार्यरत असलेल्या विभागात त्या कर्मचाऱ्याची कमतरता रिक्त पदांअभावी नेहमी जाणवते. प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयाने सदरहू कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होताच त्याची सेवा त्याच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करावे.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११०१७०५४४६२०७ असा आहे. सदरहू आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.01.10 16:45:42 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. द्वि कि.वानखेडे, लिपिक-टंकलेखक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (विभागामार्फत)

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती, कॅम्प, अमरावती-४४४३०२ यांना त्यांचे पत्र क्र. कक्ष-२१/आस्था/अका/कावि-५२१/२०१९, दि.१६-०७-२०१९ च्या पत्राच्या अनुषंगाने सादर
४) सह/उप सचिव (आस्थापना), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

त्यांना विनंती करण्यात येते की, श्री. द्वि कि.वानखेडे, लिपिक-टंकलेखक यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देताना परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करुन काढण्यात आलेल्या आदेशाची प्रत या कार्यासनाकडे तात्काळ पाठविण्यात यावी.

५) सह/उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

त्यांना विनंती करण्यात येते की, श्री. वानखेडे, लिपिक-टंकलेखक यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने तहसील कार्यालय, अचलपूर, जि. अमरावती या कार्यालयात त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाकडे पाठपुरावा करावा.

६) सा.प्र.वि./का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती).